**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या मत्स्यव्यवसाय विभागातील कर्मचाऱ्यांची ८ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. मत्स्यआ-२०२०/प्र.क्र.२८/पदुम-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२०.

वाचा : १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब दिनांक २१.१२.२०१९.
२) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/प्रशा/१५१२०१/२३३/२०१९ दिनांक २७.१.२०२०
३) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/प्रशा/१५१२०१/२३३/२०१९ दिनांक ३.२.२०२०.
४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७-अे/१६-ब दिनांक ३०.६.२०२०.
५) शासन शुध्दीपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७-अे/१६-ब दिनांक २८.९.२०२०.

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३०/६/२०२० चा शासन निर्णय व दिनांक २८/९/२०२० च्या शुध्दीपत्रकान्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. यास्तव मत्स्यव्यवसाय विभागातील एकूण ८ कर्मचारी यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मत्स्यव्यवसाय विभागातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, त्या प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या कर्मचाऱ्यांसाठी तसेच जात प्रमाणपत्र पडताळणीच्या निर्णयाविरुध्द न्यायालयात दावा दाखल केलेल्या परंतु मा.न्यायालयाने जात प्रमाणपत्र पडताळणीच्या निर्णयास स्थगिती दिलेली नाही अशा प्रकरणातील कर्मचाऱ्यांसाठी संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर या शासन निर्णयान्वये विवरणपत्र १ मध्ये दर्शविल्याप्रमाणे ८ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत.

२. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे कर्मचारी सद्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून, सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्याने करावयाच्या नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याच्या कालावधीसाठी किंवा संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत अस्तित्वात राहतील.

३. ज्या कर्मचाऱ्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात मा.न्यायालयामध्ये याचिका प्रलंबित असतील अशा प्रकरणी सामान्य प्रशासन विभागाच्या (कार्यासन १६-ब) शासन निर्णय दिनांक २१.१२.२०१९ मधील ३ (क) येथील सुचनेनुसार आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभागाने मा.सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हिल अपिल क्रमांक ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ६.७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करुन अशी प्रकरणे तात्काळ निकाली काढण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी. तद्नंतर सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही आयुक्त मत्स्यव्यवसाय विभागाने करावी.

४. गट-क व गट-ड या पदाचे नियुक्ती प्राधिकारी हे आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभाग असल्याने संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवा त्यांना सदर पदावर वर्ग केल्याच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्याचे आदेश आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभाग कार्यालयाने सामान्य प्रशासन विभागाच्या (साप्रवि/१६-ब) दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयानुसार तात्काळ निर्गमित करावेत व त्याची प्रत शासनास उपलब्ध करुन द्यावी.

५. अधिसंख्य पदाच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत त्या विभागाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तिय वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९ व क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दिनांक ३०.६.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०३१३१२४२६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASTRI SHRINIVAS JAGANNATH
Digitally signed by SHASTRI SHRINIVAS JAGANNATH
DN: CN = SHASTRI SHRINIVAS JAGANNATH, C = IN, S = MAHARASHTRA, O = Personal
Date: 2020.11.03 13:14:17 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती/लातूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.

६. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा, मुंबई-४०० ०५१.
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१६-ब), मंत्रालय, मुंबई.
१०. सह सचिव, वित्त विभाग, कार्यासन आ.पु.क., मंत्रालय, मुंबई.
११. संबंधित कर्मचारी (आयुक्त मत्स्यव्यवसाय विभाग यांचेमार्फत)
१२. निवडनस्ती.

**जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या तसेच जात वैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेले कर्मचारी.**

**विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्यांची नावे | मूळ नियुक्तीचा दिनांक | मूळ नियुक्तीचे पद | सध्या कार्यरत असलेले पद व ठिकाण | सेवा निवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | श्री.सुरेश शंकरराव बाबूलगावे | ८.७.१९९७ | सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी, भाटेगाव, स.आ.म. यांचे कार्यालय, हिंगोली. | ३०.४.२०३१ |
| २. | श्री.रविंद्र रामलू बादावार | ८.७.१९९७ | सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी, करडखेड स.आ.म. यांचे कार्यालय,नांदेड | ३१.१.२०१८ |
| ३. | श्री.कल्पेश राजेंद्र ठाकूर | १०.६.२०१५ | लघुलेखक (मराठी/इंग्रजी), (निम्नश्रेणी) | लघुलेखक (मराठी/इंग्रजी) (निम्नश्रेणी), प्रा.उ.म.नागपूर. | ३०.६.२०४९ |
| ४. | श्री.सुरेश रामाजी सोरते | १७.६.१९९७ | लिपिक नि टंकलेखक, आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई. | वरिष्ठ लिपिक, प्रा.उ.म.नागपूर. | ३१.१.२०३० |
| ५. | श्री.प्रमोद गजानन देवधरे | १०.७.१९९८ | कनिष्ठ लिपिक टंकलेखक | कनिष्ठ लिपिक, स.आ.म. यांचे कार्यालय, नागपूर. | ३०.६.२०२८ |
| ६. | श्री.सतिश नारायणराव क्षीरसागर | १०.७.१९९८ | कनिष्ठ लिपिक टंकलेखक | कनिष्ठ लिपिक, स.आ.म. यांचे कार्यालय, नागपूर. | ३०.४.२०२९ |
| ७. | श्री.राजेंद्र दत्तात्रय बदामे | ११.२.१९९२ | वाहनचालक, मुख्य कार्यकारी अधिकारी, मत्स्यसंवर्धन यंत्रणा, अकोला. | वाहनचालक, प्रा.उ.म.अमरावती. | ३०.९.२०२४ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८. | श्री.राजाराम रामकृष्ण लडगे | २१.३.१९९६ | कबुतर पालक-नि पहारेकरी म.प्र.अ., वर्सोवा | शिपाई, म.प्र.अ. वर्सोवा यांचे कार्यालय. | ३०.६.२०२० |

SHASTRI SHRINIVAS JAGANNATH
Digitally signed by SHASTRI SHRINIVAS JAGANNATH
DN: CN = SHASTRI SHRINIVAS JAGANNATH, C = IN, S = MAHARASHTRA, O = Personal
Date: 2020.11.03 13:14:40 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**